**सन २०२०-२१ करीता लेखाशिर्ष (२४०१०३०५) (००) (०२) बीज, रासायनिक खत नियंत्रण व किटकनाशक चाचणी प्रयोगशाळा (अनिवार्य) या लेखाशिर्षाअंतर्गत बाबींकरीता पुनर्वितरणाद्वारे निधी मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०२०/ प्र.क्र. ६८/१७-अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २४/०६/२०२०

वाचा:-

१) कृषी आयुक्तालय, पुणे यांचे जा. क्र. कृउसं/गुनि-६/अर्थ अंदाज/ न.क्र. २९/ १२४४९, दिनांक ०४/०५/२०२०

२) कृषी आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र. कृउसं(प्र)/लेखा/अ.वा./न.क्र.०१/१३५२०/२०२०, दिनांक ०१/०६/२०२०.

**प्रस्तावना :-**

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशिर्ष (२४०१०३०५) (००) (०२) बीज, रासायनिक खत नियंत्रण व किटकनाशक चाचणी प्रयोगशाळा (अनिवार्य) २१ पुरवठा व सामग्री या बाबीकरीता रु. २३.६० लाख इतकी रक्कम अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. राज्यामध्ये बीज परिक्षण प्रयोगशाळा, किटकनाशक चाचणी प्रयोगशाळा खत नियंत्रण प्रयोगशाळा, जैविक किड नियंत्रण प्रयोगशाळा अशा २४ प्रयोगशाळा कार्यरत आहेत. या प्रयोगशाळांसाठी लेखाशिर्ष २४०१०३०५ खालील २१ पुरवठा व सामग्री या बाबीकरीता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणीच्या तुलनेत अत्यंत कमी निधी मंजूर झाल्यामुळे निधी अभावी प्रयोगशाळांचे कामकाज चालू शकत नसल्याची बाब कृषी आयुक्तालयाने निदर्शनास आणली आहे. सद्यस्थितीत सर्व प्रयोगशाळांमध्ये तपासणीसाठी नमुन्याची आवक सुरु असून त्यासाठी बियाणे तपासणीसाठी जर्मिनेशन पेपर, वॅक्स पेपर, बी.टी.कापूस नमूने तपासणीसाठी इलायझा किट व रसायने खरेदी करणे, जैविक कीड नियंत्रण प्रयोगशाळांमध्ये उत्पादीत केलेल्या जैविक खतांचा पुरवठा करण्यासाठी एचडीपीई बॉटल्सची खरेदी करुन प्रयोगशाळा चालू ठेवण्यास अडचणी येत असल्याचे नमूद करुन २१ पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टा अंतर्गत रु. १.०० कोटी निधी वितरीत करण्याची मागणी कृषी आयुक्तालयाने संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये शासनास केली आहे.

राज्यात कोवीड १९ रोगाच्या प्रादुर्भावामुळे व लॉकडॉउनच्या परिस्थतीमध्ये राज्याची कर व करेत्तर उत्पन्नातील अपेक्षित महसुली घट व त्याचे राज्याच्या अर्थव्यवस्थेवरील होणारे परिणाम विचारात घेता, कृषी आयुक्तालयाने मागणी केल्याप्रमाणे रु.१.०० कोटी निधी २१ पुरवठा व

सामुग्री बाबीसाठी वितरीत करणे शक्य होत नाही. तथापि, कृषी आयुक्तालयाने विदीत केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, प्रयोगशाळांचे कामकाज सुरु ठेवण्याच्या दृष्टीकोनातून लेखाशिर्ष २४०१०३०५ खालील अन्य बाबी खाली करण्यात आलेली तरतूद विचारात घेवून ०२ मजूरी, ११ प्रवासखर्च, १३ कार्यालयीन खर्च याची तरतूद कमी करुन २१ पुरवठा व सामुग्री या उद्दीष्टांसाठी पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

आर्थिक वर्ष २०२०-२०२१ करीता लेखाशिर्ष (२४०१०३०५) (००) (०२) बीज, रासायनिक खत नियंत्रण व किटकनाशक चाचणी प्रयोगशाळा (अनिवार्य) या लेखाशिर्षा खालील ०२ मजूरी, ११ प्रवास खर्च आणि १३ कार्यालयीन खर्च या उद्दीष्टांसाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदी कमी करुन २१ पुरवठा व सामुग्री या उद्दीष्टांसाठी वित्त विभागाच्या मान्यतेने पुढीलप्रमाणे पुनर्वितरणाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

(रुपये हजारात)

| अ.क्र. | तपशीलवार शिर्ष | मुळ अर्थसंकल्पीत तरतूद | पुनर्वितरणाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी | पुनर्वितरणानंतर उपलब्ध निधी |
|---|---|---|---|---|
| १. | ०२ मजूरी | ५०८९ | (-) १००० | ४०८९ |
| २. | ११ प्रवास खर्च | १०८९ | (-) १४० | ९४९ |
| ३. | १३ कार्यालयीन खर्च | ३७६५ | (-) १५०० | २२६५ |
| ४. | २१ पुरवठा व सामुग्री | २३६० | (+) २६४० | ५००० |
| | | १२३०३ | | १२३०३ |

२. राज्यातील कृषि निविष्ठांच्या गुणवत्ता नियंत्रण प्रयोगशाळांकरीता आवश्यक असणाऱ्या बाबी खरेदी करण्याकरीता तसेच, राज्यातील शेतकऱ्यांना बाजारपेठेत प्रमाणित बियाणे उपलब्ध करण्याकरीता उपरोक्त विवरणामधील २१ पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टाकरीता पुनर्वितरणाद्वारे मंजूर केलेली रु. २६.४० लक्ष तसेच सदर उद्दिष्टाकरीता मुळ अर्थसंकल्पीत केलेली रु. २३.६० लक्ष असे एकूण रु. ५०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर बाबीकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

मागणी क्रमांक : डी-३<br>
लेखाशिर्ष २४०१<br>
(००) (०२) बीज, रासायनिक खत नियंत्रण व<br>
किटकनाशक चाचणी प्रयोगशाळा (अनिवार्य)<br>
(२४०१०३०५)

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिका-यांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९१/ व्यय-१, दिनांक १७/०६/२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६२४१४२८३००५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Rawoo Kadam

Digitally signed by Prakash Rawoo Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash Rawoo Kadam
Date: 2020.06.24 14:38:50 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
६. कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. मुख्य गुणवत्ता नियंत्रण अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. उपसंचालक (प्रयोगशाळा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. वित्त विभाग (व्यय-१ व २, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१०. प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. सर्व जिल्हा शासकीय गुण नियंत्रण प्रयोगशाळा
१२. कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. १७-अे कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती).